संत गाडगेबाबा निर्वाण भूमी, वलगांव, ता. व जि. अमरावती येथे येथे मुलभूत सुविधा निर्माण करण्याचा विकास आराखडा स्वीय प्रपंजी खात्यास मुदतवाढ देणेबाबत...

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१३/प्र.क्र.३४/१४४४
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: ३१ ऑक्टोबर, २०१५.

वाचा —

शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.७७/का.१४४४ दिनांक २२ ऑक्टोबर, २०१२
शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१३/प्र.क्र.३४/का.१४४४ दिनांक १ ऑगस्ट, २०१३
शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१३/प्र.क्र.३४/का.१४४४ दिनांक ९ फेब्रुवारी, २०१५.
विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्रमांकः आकाअ/नियो/ वविआ/ पीएलमुदतवाढ/सांस/२२०/२०१५ दिनांक ३१ मार्च, २०१५.

प्रस्तावना :

संत गाडगेबाबा निर्वाणभूमी वलगांव, ता.जि.अमरावती येथे मुलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी शासनामार्फत वितरीत केलेला निधी कोषागारातून आहरित करुन स्वीय प्रपंजी खात्यामध्ये जमा करण्यासाठी विभागीय आयुक्त, अमरावती यांच्या नांवे स्वीय प्रपंजी खाते उघडण्यास अनुक्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. स्वीय प्रपंजी खात्यामधील अखर्चित रक्कम प्रत्यार्पित न करता पुढील आर्थिक वर्षात खर्च करण्यास्तव स्वीय प्रपंजी खात्यास मुदतवाढ देण्याबाबत विभागीय आयुक्त, अमरावती यांनी केलेल्या विनंतीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

संत गाडगेबाबा निर्वाणभूमी वलगांव, ता.जि.अमरावती विकास आराखडा विहित कालावधीत पूर्ण करण्याकरिता विभागीय आयुक्त, अमरावती यांच्या नांवे उघडण्यात आलेले स्वीय प्रपंजी खाते दिनांक ३१.०३.२०१६ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास तसेच स्वीय प्रपंजी खात्यामधील अखर्चित रक्कम खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १७४/१५/कोषा प्र-५ दिनांक १० ऑगस्ट, २०१५ अन्वये तसेच महालेखापाल कार्यालयाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक

TM/Ch.२/UOR/Planning/PLA/२०१५-१६/७४२, दिनांक १८ सप्टेंबर, २०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०३११४५३४३१२१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yatin Arvind Pimpley

Digitally signed by Yatin Arvind Pimpley
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yatin Arvind Pimpley
Date: 2015.10.31 17:02:39 +05'30'

(य.अ.पिंपळे)

अवर सचिव

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
४. जिल्हाधिकारी, अमरावती.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
६. वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६)/(कोषा.प्र.-५), मंत्रालय, मुंबई.
७. नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती/का-१४४४, मंत्रालय, मुंबई.

-----------